नवनिर्मित मराठी भाषा विभागाकरिता
आहरण व संवितरण अधिकारी आणि
नियंत्रक अधिकारी घोषित करणेबाबत

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग,
शासन निर्णय क्रमांक अर्थसं २०११/प्र.क्र. ७५/११/२०- ब
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ५ मे, २०११

वाचा:- १) शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक आरओबी २०१०/ १०८/१८(र.व का.) दिनांक २९ नोव्हेंबर, २०१०.

**शासन निर्णय:-** मराठी भाषेचा विकास व संवर्धनाकरिता शासन अधिसूचना सामान्य प्रशासन विभाग दिनांक २९ नोव्हेंबर, २०१० अन्वये स्वतंत्र प्रशासकीय विभाग म्हणून मराठी भाषा विभागाची स्थापना करण्यात आली आहे. नवनिर्मित विभागामध्ये मराठी भाषेशी संबंधित सामान्य प्रशासन विभागातील भाषा संचालनालय व राज्य मराठी विकास संस्था आणि पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागातील महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृती मंडळ आणि महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ ही कार्यालये वर्ग करण्यात आली आहेत. नवनिर्मित मराठी भाषा विभागाच्या योजनेतर व योजनांतर्गत खर्चाकरिता नवीन लेखाशीर्ष उघडण्यात आली असून त्याकरिता महाराष्ट्र कोषागार नियम , १९६८ खंड एक मधील नियम १५(३) च्या तरतुदीनुसार नवनिर्मित मराठी भाषा विभागासाठी अवर सचिव (आस्थापना) मराठी भाषा विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी आणि उपसचिव , मराठी भाषा विभाग यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौसं क्र.११०/११//कोषा -५, दि.१९/४/२०११ तसेच अनौसं क्र.४३५/११/अर्थस-१४, दिनांक २ मे, २०११ नुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra. gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०११०५०५१६२००६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(अं.वि.अंभिरे)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपाल यांचे सचिव,राजभवन, मुंबई.

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
अध्यक्ष, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोष निर्मिती मंडळ, मुंबई,
संचालक , भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य मुंबई ,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
सर्व उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,
उप सचिव, नियोजन विभाग, कार्या. १४१२ / १४४३ / १४४४,
उप सचिव, वित्त विभाग /कोषा- ५, व्यय- ४ , अर्थसं- ११, अर्थसं -१४, विनियमन, मंत्रालय, मुंबई
सामान्य प्रशासन विभाग, कार्या.१९, कार्या.२४, कार्या.२५, कार्या.२६, मंत्रालय, मुंबई,
सर्व कार्यासने, मराठी भाषा विभाग, मंत्रालय , मुंबई
निवड नस्ती/कार्यासन - २०ब